राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्यांक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: नाक्षेयो-२०१५/प्र.क्र.१३७/का.९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १७ जुलै, २०१५.

**संदर्भ :-** शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्षेविका-२०१५/प्र.क्र.७६/का.९, दि. १८ जून, २०१५

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१५-१६ या वर्षात राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

२. क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मिळण्यासाठी जळगाव महानगरपालिकेचा शासनास प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छानना करण्यात आली. छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र ठरलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत जळगाव, महानगरपालिकेला वार्ड क्रमांक २३ मध्ये मुस्लिम कब्रस्थान व इदगाह मैदानावर जाण्यासाठी असलेल्या लेंडी नाल्यावर पूल बांधणे यासाठी रु.१७,७८,६००/- व प्रभाग क्रमांक ३५ शिरसोली नाका डिमार्ट समोरील राम नगर, रहीम नगर मध्ये नवीन पी.व्ही. सी. पाईप लाईन टाकणे यासाठी रु.२,२१,४००/- असे एकूण रु.२०लक्ष (एकूण वीस लक्ष फक्त) अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान जिल्हाधिकारी,जळगाव यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

३. जळगाव, महानगरपालिकेला मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. जळगाव, महानगरपालिकेने मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी जळगाव, महानगरपालिकेने निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडूनअनुदान वितरित करण्यात आल्यानंतर जळगाव, महानगरपालिकेने सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण २००, इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना(०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (०७) अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात क्षेत्र विकास योजनेकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं २०१५/ प्र.क्र.८५/ अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१७१२३६१०८७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.07.17 12:39:06 +05'30'

**( अैनुल अत्तार )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,

५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

९. संबंधित विभागीय आयुक्त,

१०.आयुक्त,महानगरपालिका ,जळगाव

११. जिल्हाधिकारी,जळगाव

१२.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,

१३.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,

१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी ),

१५.निवडनस्ती का-९.

**शासन निर्णय , अल्पसंख्याक विकास विभाग क्र.नाक्षेयो-२०१५ /प्र.क्र.१३७ /का.९ दि. १७ जुलै, २०१५**

## परिशिष्ट - "ब"

## उपयोगिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. नाक्षेयो-२०१५/ प्र.क्र.१३७/ का.९ दि. १७ जुलै, २०१५ अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे:-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ. | रु. |
| ब. | रु. |
| क. | रु. |
| ड. | रु. |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका, जळगाव यांची स्वाक्षरी | जिल्हाधिकारी, जळगाव यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |